# इस्लाम

# आणि

# मानवजातीची एकता

लेखक

मकबूल अहमद फलाही

भाषांतर

शाहजहान मगदुम

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# इस्लाम आणि मानवजातीची एकता

भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळातील सर्व माणसांना जर एका ठिकाणी एकत्र जमा केले गेले आणि त्यांना त्यांच्या भावना व अनुभव आणि त्यांच्या गरजांच्या बाबतीत प्रश्न विचारला गेला तर सर्वांची उत्तरे एकसारखी असतील. कोणताही मनुष्य असा निघणार नाही जो आनंद व दुःखाच्या भावना आणि नैसर्गिक आवश्यकतांपासून मुक्त असेल अथवा त्याच्या भावना दुसऱ्यांच्या भावनांपासून आणि त्याच्या नैसर्गिक गरजा दुसऱ्यांच्या नैसर्गिक गरजांपासून भिन्न असतील. परंतु असे असूनसुद्धा माणसे वेगवेगळ्या जाती व टोळ्यांत विभाजित झाले आहेत आणि प्रत्येक जात दुसऱ्या जातीशी युद्धात निमग्न आहे. जणू प्रत्येक टोळी आणि प्रत्येक मनुष्याचा स्वभाव वेगळा आणि त्यांच्या गरजा भिन्न व परस्परविरोधी आहेत. आशियाच्या रहिवाशाला आपल्या जीवनासाठी ज्या गोष्टीची गरज आहे, अमेरिकावासी त्यांच्याबद्दल बेपर्वा आहे. युरोपच्या मूळ गरजा आफ्रिकेच्या मौलिक गरजांपेक्षा भिन्न आहेत. रोमन गृहस्थाच्या ज्या भावना व अनुभूती आहेत त्यापेक्षा वेगळ्या भावना अनुभूती ग्रीकाच्या आहेत.

## जीवनाला एका उद्देशाची गरज आहे

वस्तुस्थिती अशी आहे की सर्वच माणसे आपल्या नैसर्गिक भावना, तात्विक लाभ व मूळ गरजांच्या दृष्टीने एकतेच्या सूत्रात बांधलेले आहेत. मग कोणती अशी गोष्ट आहे, जी त्यांना संघर्ष व टकरावकडे नेते व एकमेकाला हानी पोचविण्यास व रक्त सांडण्यास प्रवृत्त करते? याचे उत्तर असे आहे की मनुष्य या जगात आपल्या जीवनासाठी एखादा असा उद्देश इच्छितो जो त्याच्या इच्छा व आकांक्षांचे केंद्र असेल. त्याच्या सभोवती आपल्या सर्व शक्तींना व योग्यतांना त्यांने खर्च करावे आणि आपले प्राण व संपत्ती आणि वेळ अर्पण करावे. त्याला प्राप्त करून त्याने शांती व समाधानाचा अनुभव करावा. ते त्याच्या जीवनाची प्राप्ती आहे. अशाप्रकारच्या एखाद्या उद्देशाविना त्याला शांती लाभू शकत नाही. इतकेच नव्हे तर तो जिवंतदेखील राहू शकत नाही. या जीवन उद्देशाला प्राप्त करण्यासाठी माणसात विरोध होता आणि हाच विरोध त्यांच्या सर्व भांडणांचे मूळ आहे.

## जीवनाचे चुकीचे उद्देश

कुणी म्हटले आहे की मानवाच्या जीवनाचा उद्देश घराणे व जातीची सेवा होय. जातीच्या लाभासाठी धडपड, तिचे समर्थन, तिचा पक्ष घेणे व शत्रूपासून तिचे संरक्षण करणे माणसाचे पवित्र कर्तव्य आहे कारण जातच माणसाचे संगोपनगृह आहे तीच त्याला व्यक्तित्व देते आणि धावपळीला पात्र बनविते. त्याच्या सर्व शक्ती व पात्रता जातीच्या उपकारांचे फळ असते. म्हणून त्या शक्तींचा उत्तम व्ययदेखील जातीची सेवाच होऊ शकते. तो मनुष्य यशस्वी होय, ज्याच्या शक्ती व योग्यता त्याच्या जातीच्या उपयोगी पडतात.

त्याचे उत्तर असे दिले गेले की मनुष्याच्या शक्ती व योग्यतांना केवळ ती जातच वाढवीत

नाही, ज्यात तो जन्माला येतो, तर त्याच्या प्रगती व संगोपनात बरेचसे अन्य घराणे व जाती सामील असतात. म्हणून हे बरोबर होणार नाही की माणसाने केवळ आपल्या जातीसंबंधी विचार करावा आणि तिच्या लाभासाठी सर्वकाही करावे. त्याच्या सेवेचे व त्यागाचे क्षेत्र आपल्या जातीपर्यंतच सीमित असता कामा नये, तर त्या सर्व जातीपर्यंत विस्तीर्ण असावयास हवे, जे एक भाषा बोलतात, कारण भाषाच विभिन्न जातींना जोडण्याचे साधन आहे. त्यानेच विचारात समानता निर्माण होते व जाती एक दुसऱ्याजवळ येतात आणि एक दुसऱ्याचे सहकारी साहाय्यक बनतात.

परंतु भाषेच्या विस्तारालादेखील बहुतेक काही शंभर भाषेच्या विस्तारालादेखील बहुतेक काही शंभर व काही हजार मैलांचे अंतर समाप्त करते. माणसाच्या लाभाचे क्षेत्र यापेक्षा अधिक विस्तृत प्रदेशावर व फार दूरवर पसरलेले असते. तो अशा लोक व जमातींशीसुद्धा संबंध ठेवण्यास विवश आहे, ज्यांची भाषा त्याच्या भाषेपासून जरी भिन्न असते तरी ज्यांच्याशी त्याचा घनिष्ठ आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक संबंध असतो व जे त्याच्याशी निकटता व नाते असल्याचा अनुभव करतात. हा संबंध व संलग्नता सामान्यत: पृथ्वीच्या त्या भागापर्यंत पसरलेल्या माणसांदरम्यान आढळते ज्याला पर्वत, नद्या, उत्पादनाची साधने, हवापाणी व ऋतूंच्या समानतेने एक केलेले असेल. व तो भौगोलिक दृष्टीने अन्य प्रदेशापेक्षा भिन्न समजला जात असावा. मानव पृथ्वीच्या या संपूर्ण प्रदेशापासून आणि त्यांच्या प्रत्येक वस्तूपासून लाभ घेत आला आहे, त्याच्यापासूनच त्याची संस्कृती आणि सभ्यता अस्तित्वात येते म्हणून म्हटले गेले आहे की माणसासमोर त्या संपूर्ण प्रदेशाची सेवा असणे आवश्यक आहे. मग त्यात कितीही भाषा बोलल्या जात असोत, कितीही जाती व टोळ्या वसलेल्या असोत व कितीही वर्ण व वंशाचे लोक वसलेले असोत. हीच कल्पना राष्ट्र व स्वदेशाचा पाया आहे. राष्ट्रीयता व स्वदेश भावनेची काही अन्य कारणेसुद्धा आहेत. या सर्व बाबी नजरेआड केल्या तरी ही एक वस्तुस्थिती आहे की राष्ट्र व स्वदेशाची सेवा आणि त्याची साहाय्यता व समर्थन जीवनाचा एक महान उद्देश राहिला आहे. वर्तमान काळसुद्धा त्याला उच्चतम जीवन-उद्देश मानतो. त्याच्या दृष्टीने राष्ट्र व स्वदेशासाठी जिवंत राहणे व मरण पत्करणे व वाटेल त्या किंमतीवर तिचे संरक्षण करणे माणसासाठी उच्च स्थान प्राप्त करणे होय. जो मनुष्य या उद्देशासाठी प्राणार्पण करील तो या गोष्टीस पात्र समजला जातो की त्याचे स्मरण होत राहावे. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या फोटोसमोर आदराने नमस्कार केला जावा व त्याच्या स्मरणाला ऐतिहासिक पृष्ठात सुरक्षित केले जावे.

## चुकीचे उद्देश मानवजातीच्या विभाजनाला कारणीभूत

जीवनाची ही सर्व उद्दिष्ट्ये माणसांना एकत्र जोडणारी नाही तर तोडणारी आहेत. कारण त्यापैकी प्रत्येक उद्देश सीमित आहे. ते विशेष स्तर व समूहाच्या लाभासाठी अस्तित्वात आले आहेत. त्यांच्यापैकी कोणताही उद्देश या गोष्टीची चर्चा करीत नाही की सर्व माणसांचा लाभ कशात आहे. हे एक सत्य आहे की कोणत्याही सीमित उद्देशाच्या अधीन विविध वंश, जाती व देशांचे एकत्र येणे शक्य नाही. जर एखाद्या माणसाच्या प्रेमाचे केंद्र, आपली जमात व आपली टोळी असेल त्याच्याशी ते लोक, जमाती व टोळ्यांनी का संलग्न राहावे ज्यांच्या लाभ व हानीमध्ये

त्याला कोणतीही रुची नसावी? जर कोणाची दृष्टी आपल्या समभाषिक लोकांपर्यंत जाऊन स्थिरावली तर अन्य भाषिकांनी त्याच्याशी का संबंध ठेवावा आणि प्रेम करावे? जर माणसाच्या जीवनाचा उद्देश काही विशिष्ट पर्वत आणि नद्यांच्या दरम्यान सीमित असेल तर त्या उद्देशाशी त्या लोकांना काय रूची असेल जे या क्षेत्राबाहेर आहेत आणि जे त्या पर्वत व नद्यांचा लाभ घेत नाहीत?

## चुकीचे उद्देश शत्रुत्वाला जन्म देतात

वस्तुस्थिती अशी आहे की या चुकीच्या उद्देशांनी लोकसमूहात फूट पाडली आणि त्यांच्या दरम्यान तिरस्कार व शत्रुत्वाचे बी पेरले आहेत. प्रत्येक मनुष्य आपल्या खेळात बंदिस्त होऊन विचार करतो आणि दुसऱ्यांचे प्रश्न व अडचणीबद्दल त्याला गोडी राहिलेली नाही. सत्य असो किंवा असत्य आपल्या स्तर व आपल्या समूहाच्या समर्थनाला परमकर्तव्य समजतो. आंतरराष्ट्रीय संबंधसुद्धा लाभाच्या अधीन झाले आहेत. आपल्या जमातीच्या लाभासाठी दुसऱ्या जमातीला हानी पोचविण्या-पासूनदेखील अलिप्त राहिले जात नाही. पंथ पंथांशी संघर्ष करीत आहेत आणि जातीजातींशी युद्ध करीत आहेत. मानवजात शांती व सुरक्षेपासून फारच दूर होत चालली आहे. युद्धाचे काळेकुट्ट ढग सर्वत्र जमले आहेत. मनुष्य निरंतर भयछत्राखाली जगत आहे की न जाणे केव्हा त्यांच्यातून अग्नीचा वर्षाव होईल वमनुष्य निरंतर भयछत्राखाली जगत आहे की न जाणे केव्हा त्यांच्यातून अग्नीचा वर्षाव होईल आणि वस्त्या वैराण होवून स्मशान भूमीत परिवर्तित होतील.

## विश्वव्यापी बंधुत्वाची कल्पना व त्यातील उणिवा

याच्या सोडवणुकीसाठी विश्वव्यापी मानवी बंधुत्वाची कल्पना प्रस्तुत केली जाते. म्हणजे सर्व जमातींनी आपल्या संयुक्त लाभासाठी एकत्र यावे व त्यांच्या वाट्यासाठी एकजुटीने संघर्ष करावा. स्वतःही जिवंत राहावे आणि दुसऱ्यांनासुद्धा जिवंत राहू द्यावे. परंतु ही एक काल्पनिक संकल्पना आहे. जगाने अद्याप त्याचे समर्थन केलेले नाही. माणसाचे सर्व निर्णय व धैर्य त्याच्या दृष्टिकोनाच्या अधीन असतात. दृष्टिकोनाच्याच आधारे तह व युद्ध मैत्री व शत्रुत्व होते. यांच्यामुळेच संपर्क व संबंधांत दृढता अथवा निर्बलता येते. दृष्टिकोनात विरोध असेल तर मतभेद निश्चितपणे जन्म घेतील. जो मनुष्य साम्यवादावर विश्वास ठेवीत असेल त्याच्यासाठी भांडवलशाहीकडे तडजोडीचा हात पुढे करणे असंभव आहे. राष्ट्रप्रेमी बुद्धी राष्ट्रीयतेच्या विरोधकाला सहन करू शकत नाही. वैचारिक मतभेदाचा इतिहास दर्शवितो की यामुळे माणसांच्या दरम्यान नेहमी वाद व युद्ध होत राहिले आहेत. हे कसे संभव आहे की आज हीच गोष्ट मैत्री व प्रेमाचे साधन बनावे? हा असा नैसर्गिक प्रश्न आहे ज्याकडे दुर्लक्ष केले जाऊ शकत नाही आणि विश्वव्यापी बंधुत्वाची संकल्पना मांडणाऱ्याकडून आजपर्यंत त्याचे उत्तर दिले जाऊ शकले नाही.

## मानवी एकतेचा इस्लामी पाया

इस्लामने याचे बरोबर उत्तर दिले आहे. त्याने केवळ असेच नव्हे की सर्व माणसांना एक मानवी एकता ठरविले आहे तर त्यासाठी फारच मजबूत व पक्का पाया उपलब्ध करून दिला हे त्याने सांगितले की संपूर्ण मानवजातीचा अल्लाहसुद्धा एकच आहे व त्यांचे मूळसुद्धा एकच आहे. म्हणून ते आपली सर्व प्रकारची विभिन्नता असूनदेखील एक एकता आहेत. इस्लाम याच सत्याकडे येण्याचे जगाला आवाहन करीत आहे. त्याचा प्रसार करण्याचा व प्रभावी बनविण्याचा प्रयत्न करीत आहे आणि या मार्गात जे दूषित पूर्वग्रह येतील त्यांना दूर करणे आवश्यक समजतो. इस्लामने उपलब्ध केलेल्या या पायाला मान्य केले तर भेदाभेदाच्या अंधकारातून एकतेच्या सूर्याचा उदय होऊ शकेल. आणि ज्या जाती व जमाती परस्पर संघर्षात मग्न आहेत त्या एकत्र येऊन जीवन जगू शकतील.

## संपूर्ण मानवजात एकाच अल्लाहची सेवक आहे

इस्लामने अल्लाहची योग्यतम संकल्पना दिली आहे. हाच त्याच्या शिकवणीचा प्राण आहे. तो या सत्याला पुराव्याच्या पूर्ण शक्तीसह प्रस्तुत करीत आहे की ही लांब रूंद सृष्टी जिच्या विस्ताराची कल्पना केली जाऊ शकत नाही ती एकाच अल्लाहद्वारे निर्मित आहे.त्याचीच याच्यावर सत्ता चालते. मनुष्यदेखील त्याच्या अगणित निर्मितीप्रमाणे एक निर्मिती होय. तोच त्याचा निर्माता, स्वामी, उपास्य व सत्ताधिकारी आहे. त्यानेच त्याच्यासाठी हवा, पाणी, प्रकाश, उष्णता व गारवा निर्माण केला, महासागर व जमिनीचा ताबा घेतला. तोच त्याचा अन्नदाता व पालनपोषण करणारा आहे, त्याच्याच हातात मृत्यू व जीवन, रोग व आरोग्य आणि दारिद्र्य व खुशाली आहे. तोच त्याची प्रार्थना ऐकतो व इच्छापूर्ती करतो. तोच अडचणी दूर करणारा व गरजा पूर्ण करणारा आहे, तोच त्याचा खरा आधार आहे, जेव्हा सर्व आधार तुटतात तेव्हा त्याचाच आधार उपयोगी पडतो, तोच आश्रय देणारा आहे, त्याने आश्रय न दिल्यास त्याला कोठेही आश्रय मिळू शकत नाही आणि त्याने जर मदतीचा हात दिला नाही तर कोणीसुद्धा त्याला मदत करू शकणार नाही. त्याचे उपकार इतके अधिक आहेत आणि मनुष्य त्या उपकारात इतका बुडालेला आहे की तो त्यांची गणनाही करू शकत नाही आणि त्यांचे खऱ्या अर्थाने आभारसुद्धा मानू शकत नाही. ''अल्लाह तोच आहे ज्याने आकाश व पृथ्वीला निर्मिले व आकाशातून पाणी उतरविले मग त्याद्वारे तुमच्या उपजीविकेसाठी निरनिराळी फळे निर्माण केली व त्यानेच तुमच्यासाठी नौका उपलब्ध केली जेणेकरून समुद्रात त्याच्या आज्ञेने चालावे आणि त्याने तुमच्यासाठी सूर्य व चंद्राला ताब्यात घेतले जे निरंतर चालत आहेत व त्यानेच तुमच्यासाठी रात्र व दिवसाला ताब्यात घेतले आणि जे काही तुम्ही मागितले म्हणजे ज्या वस्तूची तुमच्या अस्तित्व व जीवनासाठी आवश्यकता होती त्या सर्व दिल्या. जर तुम्ही अल्लाहच्या देणग्यांची गणना करू इच्छित असाल तर ते करू शकत नाही. नि:संशय मनुष्य मोठाच अन्यायी व मोठा कृतघ्न आहे.''

(दिव्य कुरआन, १४:३२-३४)

## सर्वांच्या जीवनाचा उद्देश अल्लाहची आराधना होय

मनुष्य आपल्या याच स्वामी व उपासनेच्या आराधनेसाठी निर्माण केला गेला आहे. या जगात हीच त्याची खरी स्थितीसुद्धा आहे आणि हीच त्याला शोभा देते. अशा तऱ्हेनेच तो अल्लाहच्या उपकारांबद्दल कृतज्ञता व्यक्त करू शकतो आणि स्वत: सेवक असल्याचा पुरावा देऊ शकतो.

''हे लोकहो! उपासना करा आपल्या पालनकर्त्यांची ज्याने तुम्हालाही निर्माण केले व त्या लोकांनाही निर्माण केले जे तुमच्या पूर्वी होऊन गेले आहेत. आशा आहे तुम्ही त्याच्या कोपापासून वाचू शकाल. तोच आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीला बिछायत व आकाशाला छत बनविले आणि आकाशातून पाणी उतरविले व त्याद्वारे फळांचे अन्न तुमच्यासाठी काढले म्हणून अल्लाहबरोबर कुणाला भागीदार करू नका आणि तुम्ही जाणता (की हे काही धर्मानुकूल नव्हे).''

(दिव्य कुरआन, २:२१-२२)

## हीच पैगंबरांची शिकवण आहे

हीच शिकवण त्या सर्व पैगंबरांची व प्रिय सेवकांची होती जे महान अल्लाहकडून मानवांच्या मार्गदर्शनासाठी जगाच्या विविध भागात व निरनिराळ्या काळात येत राहिले आणि ज्यांची परंपरा अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) पर्यंत चालू राहिली.

''आम्ही तुमच्या अगोदर ज्या कोणा पैगंबराला पाठविले त्याच्याकडे हीच दिव्य वाणी पाठविली आहे की माझ्या व्यतिरिक्त कोणीही उपास्य नाही. म्हणून तुम्ही माझीच उपासना करा.''

(दिव्य कुरआन, २१:२५)

## या उद्देशासाठी सर्वजण एकत्र येऊ शकतील

जीवनाचा हा उद्देश कोणा एका व्यक्ती, वर्ग व जात आणि देशाचा नव्हे तर संपूर्ण मानवजातीचा उद्देश आहे. श्रीमंताचा, गरीबाचा, प्रगत लोकांचा, मागासलेले व पुढारलेल्यांचासुद्धा, भारतीय, चिनी, आशियावाल्यांचा, युरोपियन, रशियनांचा व अमेरिकनांचासुद्धा. महान अल्लाहने व्यक्ती व जमातीसाठी वेगवेगळे उद्देश सांगितलेले नाहीत तर सर्वांसाठी एकच उद्देश ठरविला आहे आणि पृथ्वीवर वसलेल्या प्रत्येक व्यक्ती व प्रत्येक समूहाकडून आपल्या उपासनेची अपेक्षा केली आहे.

हाच जगाचा एकमेव उद्देश आहे जो पूर्व व पश्चिम आणि उत्तर व दक्षिणेतील सर्व लोकांचा उद्देश असू शकतो आणि ज्यासाठी वर्ण व वंश आणि जात व देशाचे भेद असूनदेखील ते एकत्र येऊ शकतात. त्याच्यासंबंधी ना इराणी असे सांगू शकतात की हा केवळ अरबासाठी आहे आणि ना अरब त्याला इराणींचा उद्देश ठरवू शकतात. ना पूर्वेला तो दूरचा वाटेल ना पश्चिमेला, कारण ही प्रत्येक माणसाच्या हृदयाची हाक आहे. याच्यामुळे त्याची नैसर्गिक तहान भागते. त्याच्यात प्रत्येक वर्ण व वंश आणि पृथ्वीच्या प्रत्येक प्रदेशातील माणसासाठी आकर्षण आहे. आपल्या निर्मात्या व स्वामी आणि उपकारकर्त्यांकडे वाटचाल करणे व त्याच्याजवळ जाणे

माणसाचा स्वभाव आहे कारण पावलोपावली तो त्याच्याकडे जाण्यास आणि त्याच्या पदराखाली आश्रय घेण्यास बाध्य आहे. अडचणीत तो त्याचा आधार शोधतो आणि आनंदात त्याच्या उपकाराबद्दल कृतज्ञता व्यक्त करू इच्छितो. त्याच्या उपासना व गुलामीत त्याचा वैयक्तिक लाभ आहे आणि त्याच्याशी विद्रोह आणि त्याच्या अवज्ञेत त्याची वैयक्तिक हानी आहे. याशिवाय महान अल्लाहचे कोणीही जातीबांधव नाहीत. त्याचे एखादे घराणे आणि टोळी नाही. त्याचे अस्तित्व पृथ्वीच्या कोणत्याही प्रदेशापर्यंत सीमित नाही. तो प्रत्येक ठिकाणी उपस्थित आहे आणि तो प्रत्येकाला पाहतो व त्याची प्रार्थना ऐकतो व साहाय्य करतो. त्याच्याशी प्रत्येक मनुष्य संबंध जोडू शकतो, गौरवर्णसुद्धा नि कृष्णवर्णसुद्धा, मजूर व मालकसुद्धा, शेतकरी, व्यापारी, विद्यार्थी व गुरुसुद्धा, शासक व शासितसुद्धा; सर्वजण त्याच्या दृष्टीने समान आहेत. सर्वजण त्याच्याकडे वाटचाल करू शकतात आणि त्याच्याशी जवळीक व प्रेमाची इच्छा करू शकतात. कोणतीही व्यक्ती आपल्या कुळाच्या मोठेपणामुळे त्याच्याजवळ उच्च पद प्राप्त करू शकत नाही आणि प्रतिष्ठा व उच्चपदानेसुद्धा. त्याच्यापर्यंत पोहचण्यात दुर्दशाही आडकाठी बनत नाही आणि खुशालीसुद्धा पाठीराखी व साहाय्यक होत नाही. तो त्या प्रत्येक माणसाला पुढे सरसावून घेण्यास तयार आहे जो त्याच्याकडे सरसावतो. मग तो आफ्रीकन असो अथवा अमेरिकन, इंग्रजी बोलत असो अथवा हिंदी. जो मनुष्य स्वत:ला त्याच्या गुलामीत समर्पित होऊ इच्छितो तर त्याच्यासाठी कोणताही अडथळा नाही. ज्या कोपऱ्यातून जो कोणी त्याचा धावा करील त्याच्या त्या आळवण्याला ओ देण्यास तो तयार आहे.

''जेव्हा माझे सेवक माझ्यासंबंधी तुम्हाला प्रश्न विचारतील तेव्हा सांगा की मी त्यांच्याजवळ आहे. हाक मारणारा जेव्हा मला हाक देतो तेव्हा मी त्याची हाक ऐकतो. म्हणून त्यानेसुद्धा माझी आज्ञा पाळली पाहिजे. माझ्यावर विश्वास ठेवावा. (अशाप्रकारे) आशा आहे ते मार्गदर्शन प्राप्त करतील.'' (दिव्य कुरआन, २ : १८६)

ही कल्पना की या सृष्टीचा एक अल्लाह आहे. सर्व मानव त्याचे सेवक आहेत आणि त्याच्याच उपासनेसाठी जन्मले आहेत. एक ईश्वराचा ही कल्पना मानवातील धर्मांधता नष्ट करून त्यांना एका एकतेत परिवर्तित करते. ही कल्पना मान्य केल्यावर माणसात सन्मान आणि अपमानाचे खोटे भेदभाव कदापि उचल खाणार नाहीत. अल्लाहची उपासना करण्याची अनुभूति सेवक व स्वामी, शासक व शासित, मजूर व मालक, गोरे व काळे, अरब व इराणी, सर्वांना एका रांगेत उभी करते आणि उच्चनीचतेचे अंतर विसरून सर्वजण त्याच्यापुढे नतमस्तक होतात.

मानवजातीचे मूळ एक आहे पवित्र कुरआनने वारंवार हे सत्य स्पष्ट केले आहे की मानवजातीचा प्रारंभ एकाच जीवापासून झालेला आहे. त्याच्यापासून त्याची जोडी निर्माण केली आणि नंतर त्या दोघांपासून त्यांचा वंश वृद्धिंगत झाला. परिवार आणि टोळ्या अस्तित्वात आल्या. जाती व जमातींनी जन्म घेतला आणि मानव वस्ती पृथ्वीच्या वेगवेगळ्या प्रदेशात व क्षेत्रात वाढत गेली. जसे एके ठिकाणी म्हटले आहे,

''हे लोकहो! आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगा ज्याने तुम्हाला एका जीवापासून

निर्माण केले आणि त्याच्यापासूनच त्याची आद्य जोडीसुद्धा निर्माण केली आणि त्या दोहोंपासून असंख्य पुरुष व स्त्रियांचा प्रसार केला. तुम्ही अल्लाहचे भय बाळगा ज्याच्या नावाने आपापसात एकमेकाचे हक्क मागता आणि आपापसातील संबंधाविषयीसुद्धा भीत राहा. नि:संशय अल्लाह तुम्हाला पाहत आहे.'' (दिव्य कुरआन, ४:१)

## मानवजातीची एकता भंग करणे विकृती होय

ही या गोष्टीची घोषणा आहे की संपूर्ण मानव जात मूलत: एकाच आई-बापाची संतती आहे. ते एकमेकांचे बंधू आहेत. जे जगाच्या एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोपऱ्यापर्यंत पसरले आहेत. महान अल्लाहने त्यांच्या दरम्यान बंधुत्व व भाऊकीचे जे संबंध दृढ केलेले आहेत त्यांना तोडण्याची इस्लाम कदापि अनुमती देत नाही आणि या दिशेने पडणाऱ्या प्रत्येक पावलाचा तो विरोध करतो. त्याच्या दृष्टीने या कुटुंबव्यवस्थेला नष्ट-भ्रष्ट करण्याचा प्रत्येक प्रयत्न उपद्रव व विकृतीचा समानार्थी होय. पवित्र कुरआनने आदरणीय मूसा (अ.) आणि फिरऔनची कथा अत्यंत विस्तारपूर्वक सांगितली आहे. फिरऔनने अल्लाहशी विद्रोह केला आणि उद्धटपणा अंगीकारिला व संपूर्ण समाजाला अनेक वर्गात विभाजित केले. एक वर्ग शासकांचा होता व दुसरा शासितांचा. महान अल्लाहने आदरणीय मूसा (अ.) द्वारे हा संघर्ष संपुष्टात आणला. अत्याचारपीडितांना साहाय्य केले आणि अत्याचारींना पृथ्वीतलावरून नामशेष केले. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

''निस्संदेह फिरऔनने पृथ्वीवर उद्धटपणा केला आणि तेथील लोकांना अनेक वर्गांत विभाजित केले. त्यांच्यापैकी एका वर्गाला (बनीइस्राईल) निर्बल करून टाकले. त्यांच्या मुलांना कापीत असे आणि त्यांच्या स्त्रियांना जिवंत ठेवीत असे. नि:संशय तो विकृती करणाऱ्यांपैकी होता. आम्ही त्या लोकांवर उपकार करू इच्छित होतो, जे पृथ्वीवर निर्बल करून ठेवले गेले होते, त्यांना नेता बनवू इच्छित होतो आणि त्यांना उत्तराधिकारी बनवू इच्छित होतो आणि फिरऔन व हामान आणि त्यांच्या लष्करांना त्यांच्याद्वारे तसेच काही दाखवू इच्छित होतो ज्याने ते भयभीत होत होते.'' (दिव्य कुरआन, २८:४-६)

## वर्ण, वंश आणि भाषा वगैरेंतील अंतर निसर्गाची चिन्हे होत

मानवात रंग रूप, वंश व गोत्र, भाषा व कथन, अस्तित्व, कला व्यवसाय, जात व स्वदेशातील अंतराला इस्लाम अल्लाहच्या असंख्य चिन्हांपैकी एक निशाणी मानतो. मानवातील हा फरक दर्शवितो की या सृष्टीवर त्याचा निर्माता व स्वामीला पुरेपूर प्रभाव व अधिकार प्राप्त आहे. तो ज्याला इच्छितो त्याला सुस्वरूप निर्माण करतो व ज्याला इच्छितो त्याला कुरुप बनवितो. ज्याला इच्छितो, धन प्रदान करतो आणि ज्याला इच्छितो त्याला त्यापासून वंचित करतो. ज्याला इच्छिल पृथ्वीच्या हवे त्या प्रदेशात तो जन्मास घालतो आणि इच्छेप्रमाणे भाषा शिकवितो. जर कोणी त्यांच्यातील एखाद्या गोष्टीस आपल्या श्रेष्ठत्व अथवा कनिष्ठतेचा पुरावा मानत असेल तर तो निसर्गाच्या एका मोठ्या निशाणीपासून धडा घेत नाही. तो त्या दृष्टीपासून वंचित आहे ज्यात अल्लाहच्या निशाण्यांचे अध्ययन करण्याची योग्यता असते.

"त्याच्या निशाण्यांपैकी एक असे आहे की त्याने तुम्हाला मातीपासून निर्माण केले. मग आता तुम्ही मानव जगात पसरलेले आहात. हेदेखील त्याच्या निशाण्यांपैकी एक आहे की त्याने स्वत: तुमच्यातून तुमच्या जोड्या निर्माण केल्या जेणेकरून तुम्ही त्यांच्यापासून सुख प्राप्त करावे आणि त्याने तुमच्या दरम्यान मैत्री व दयेच्या भावना ठेवल्या. नि:संदेह यात विचारवंतांसाठी महान संकेत आहेत. त्याच्या संकेतांपैकी आहे आकाश व पृथ्वीची निर्मिती करणे आणि तुमच्या भाषा व रंगांतील फरक, नि:संशय यात जाणत्यासाठी मोठी चिन्हें आहेत. त्याच्या संकेतांपैकी रात्री तुमचे निजणे आणि दिवसा त्याच्या कृपाप्रसादाचा (अन्न) शोध घेणेसुद्धा आहे. नि:संदेह यात बरीचशी निशाणी आहेत त्या लोकांसाठी जे म्हणणे ऐकतात." (दिव्य कुरआन)

या आयतीत काही महत्त्वाच्या सत्य बाबींचे निवेदन केले गेले आहे.

(१) महान अल्लाहने मनुष्याला मातीपासून निर्माण केले. या निवेदनाद्वारे माणसाच्या जातीय, वांशिक, आर्थिक, शैक्षणिक व वैचारिक सर्व प्रकारच्या अभिमानाचे उच्चाटन केले आहे. मनुष्य मग तो एखाद्या देशाचा राजा का असेना. एखाद्या अधिकारसंपन्न जात आणि टोळीशी त्याचा संबंध का असेना. मोठ्यात मोठा भांडवलदार आणि उद्योजक असो. ज्ञान व विद्वत्ता आणि सामर्थ्य व शक्तीचा पर्वत का असेना. ही वस्तुस्थिती आहे की त्याने मातीपासून जन्म घेतला आहे. मातीचे वैशिष्ट्य दीनता व नम्रता आहे. मातीच्या या पुतळ्यात गर्व त्याचवेळी येऊ शकतो जेव्हा त्याला स्वत:ची वस्तुस्थिती कळत नाही आणि तो आपले सामर्थ्य विसरून जातो.

(२) जगाने स्त्री व पुरुषालासुद्धा निम्नतर व उच्चतर अशा स्तरात विभाजित केले होते. पुरुष उच्चतर होता व स्त्री निम्नतर होती. आजसुद्धा हे विभाजन व्यवहारात उरलेले आहे. पवित्र कुरआनच्या या निवेदनाने की अल्लाहने पुरुषाची जोडी त्याच्याच प्रकारातून निर्माण केली, या खोट्या विभाजनाचे खंडन होते. पुरुषाची जोडी त्याच्याच सजातीतून आहे. कोणत्या अन्य प्रकारापासून नव्हे म्हणून त्यांच्यापैकी कोणी निम्नतर असणे अथवा श्रेष्ठतर असण्याचा प्रश्नच निरर्थक आहे. अल्लाहने त्यांच्यात स्नेह व प्रेम भरले आहे त्यांच्यात तिरस्कार अथवा शत्रुत्व निर्माण करणे किंवा शत्रूत्व असणे पूर्णपणे अनैसर्गिक आहे.

(३) सांगितले (अल्लाहच्या निशाण्यापैकी एक निशाणी आकाश व पृथ्वी निर्माण करणेसुद्धा आहे.) निसर्गाच्या या निशाणीला कोणी अमान्य करू शकत नाही. यात या गोष्टीकडेदेखील सूक्ष्म इशारा आहे की लक्षावधी मैलांचे अंतर आणि लांबी असूनदेखील अल्लाहच्या आज्ञेने पृथ्वी व आकाशामध्ये ऐक्य निर्माण केले आहे. ते एखाद्या संघर्षाविना अल्लाहने ठरविलेल्या व्यवस्थेच्या अधीन भ्रमण करीत आहेत. जर पृथ्वीतलावरील लोकसुद्धा त्याच्या आज्ञांचे पालन करतील तर त्यांची सर्व भांडणे व संघर्षाचे प्रश्न संपुष्टात येऊ शकतील आणि त्यांच्या दरम्यान ऐक्य उत्पन्न होऊ शकेल.

(४) रंग, रूप आणि भाषेच्या अंतरालादेखील निसर्गाची एक निशाणी ठरविले. ही गोष्ट स्पष्ट आहे की निसर्गाच्या निशाण्या त्यापासून बोध घेण्यासाठी असतात, भांडणतंट्यासाठी नसतात.

(५) या जगात प्रत्येक मनुष्य, निद्रा, जागरण व पोटा पाण्यासाठी धावपळ करण्यास बाध्य आहे. हीदेखील निसर्गाची एक निशाणी आहे जी दर्शविते की जगातील कोणताही मनुष्य आवश्यकतेपासून बेपर्वा नाही आणि या आवश्यकतांचे स्वरूपदेखील एकसारखे आहे. ज्या अर्थी आवश्यकतेने सर्वांना एक करून टाकले आहे तर त्यांच्या दरम्यान नीचता व उच्चतेचा प्रश्न निरर्थक आहे.

या वस्तुस्थितीकडे कुरआनने दुसऱ्या जागीसुद्धा विस्तारपूर्वक व काही जागा संक्षेपात लक्ष वेधले आहे. जर मनुष्याने शांत मनाने त्यावर विचार केला तर मानवजातीला तिची भिन्नता असूनदेखील मान्य करण्यास बाध्य व्हावे लागेल.

## प्रचाराचा मापदंड केवळ सदाचार आहे

मनुष्याचे दुर्दैव असे आहे की त्याने रंग व वंश, घराणे व टोळी, राष्ट्र व स्वदेश आणि भाषा व कथनातील तफावतीला निसर्गाच्या निशाण्या समजून त्यांच्यापासून बोध घेतला नाही, तर त्यांना प्रतिष्ठा व अवमान आणि उच्चता व नीचतेचे प्रमाण बनवून टाकले, वस्तुतः प्रतिष्ठा व अवमानाचा संबंध रंग, रूप, राहणीमान व वार्तालापाशी नाही तर अल्लाहवरील विश्वास व कृतीशी आहे. जो मनुष्य स्वतःला अल्लाहचा सेवक सिद्ध करतो, त्याला भिऊन जीवन व्यतीत करतो तसेच त्याच्या कृपाप्रसादाला पात्र बनण्यासाठी प्रयत्न करतो तोच खरा प्रतिष्ठित व सज्जन होय. जो मनुष्य गुणांनी रिक्त असेल त्याच्यासाठी अल्लाहजवळ प्रतिष्ठेचे कोणतेही स्थान नाही, मग लोकांच्या दृष्टीत तो कितीही उच्च पदस्थ का असेना. कुरआनने फार स्पष्टपणे सांगितले आहे.

''हे लोकहो, आम्ही तुम्हाला एक पुरुष आणि एका स्त्रीपासून जन्मास घातले व आम्ही तुम्हाला विभिन्न-जाती आणि टोळ्यात विभाजित केले जेणेकरून एकमेकाला ओळखू शकावे. निःसंशय तुमच्यात सर्वांत सज्जन अल्लाहजवळ तो आहे जो सर्वात अधिक सदाचारी आहे. निःसंदेह अल्लाह जाणणारा व माहीतगार आहे.'' (दिव्य कुरआन, ४९:१३)

कुरआनच्या या आयतीने प्रतिष्ठा व अवमानाचे सर्व खोटे प्रमाण नष्ट केले. यात स्पष्टपणे हे जाहीर केले गेले आहे की जन्मतः कोणासही कोणत्याही प्रकारे श्रेष्ठत्व प्राप्त नाही. येथे कोणीही मातेच्या उदरातून निष्पाप, चुका न करणारा म्हणून जन्म घेत नाही आणि कोणीही पापाचे गाठोडे आपल्या शिरावर लादून आणीत नाही. त्याच्या हातात न उच्चतेचे प्रमाणपत्र असते न नीचतेचा परवाना. मनुष्याची महानता व श्रेष्ठत्व त्याच्या सत्कर्म व सदाचाराशी संबंधित आहे. अल्लाहच्या दरबारात वांशिक प्रतिष्ठा व घराणे आणि टोळीविषयी नव्हे, तर सदाचाराविषयी प्रश्न केला जाईल. ज्याच्या मनात सदाचार असेल तेच त्याच्या बक्षीस व सन्मानास पात्र ठरतील. ज्यांचे जीवन अल्लाहच्या भयापासून रिक्त असतील त्यांना अल्लाहच्या पकडीपासून कोणीही वाचवू शकणार नाही.

## चुकीच्या आदर्शांची सुधारणा

जगातील विभिन्न जाती व टोळ्यांनी प्रतिष्ठा व अपमानाच्या ज्या खोट्या आदर्शांना स्वीकारले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यापैकी एकेकाला मुळासकट उखडून फेकून दिले व संपूर्ण मानवजातीसाठी सदाचार व ईशपरायणतेला प्रतिष्ठेचे आदर्श ठरविले.

## जातीय व वांशिक अभिमानावर टीका

जातीय व वांशिक अभिमानाने नेहमीच दुसऱ्या जाती व इतर वंशीयांना समान दर्जा देण्यास नकार दिलेला आहे आणि त्यांच्याशी समान व्यवहाराची अनुमती दिलेली नाही. पैगंबर मुहम्मद (स) यांनी अंतिम निरोपाच्या हज प्रसंगी जे अनुपम व्याख्यान दिले होते, त्यात यावर कठोर प्रहार केला होता व मानवजातीच्या एकतेची घोषणा केली होती. त्यांनी सांगितले होते की,

''हे लोकहो, ऐका, नि:संशय तुमचा पालनकर्ता एक आहे व तुमचा पिता (सुद्धा एक आहे) ऐका, एखाद्या अरबाला एखाद्या अरबेतरावर एखाद्या अरबेतराला एखाद्या अरबावर, एखाद्या गौरवर्णियाला एखाद्या श्यामवर्णियावर, एखाद्या श्यामवर्णियाला गौरवर्णियावर सदाचाराव्यतिरिक्त कोणत्याही आधारावर कसलेही श्रेष्ठत्व प्राप्त नाही. (ज्याच्या ठायी जितका सदाचार असेल तितकाच तो श्रेष्ठत्वधारी बनेल.)'' (हदीस : मुसनद अहमद, ५-४११)

अंतिम निरोपाच्या हज प्रसंगी संपूर्ण अरबस्थान त्यांच्या अधिपत्याखाली होता. त्यांचासुद्धा संबंध अरबस्थानशी होता आणि त्यांच्या सर्व सोबत्यांचा संबंधदेखील अरबस्थानाशीच होती. म्हणून अरबांमध्ये आपल्या श्रेष्ठत्वाची व उच्चतेची भावना निर्माण होऊ शकत होती. त्यांनी या भावनेला मूळ धरू दिल नाही आणि सांगितले की सर्व मानव एकाच अल्लाहचे सेवक आणि एकाच पित्याची संतती आहेत. त्यांच्यात श्रेष्ठत्व त्या माणसाला प्राप्त आहे जो सदाचारी व ईशपरायण असेल.

आपले एक सोबती माननीय अबू जर (रजि.) यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हीच गोष्ट अशाप्रकारे कथन केली.

''पाहा, तुम्ही एखाद्या गोऱ्या आणि काळ्यापेक्षा अधिक चांगले नाही पण अपवाद असा की तुम्ही सदाचारात त्याच्यापेक्षा पुढे मजल मारावी.'' (हदीस : मुसनद अहमद ५/१५८)

## घराणे व टोळीच्या अभिमानाची अलोचना

घराणे व टोळीच्या अभिमानानेसुद्धा मानवाच्या एकतेला हानी पोचविली आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी यासदेखील मनाई केली आहे. माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''लोकांनी (अज्ञान युगात) मृत वाडवडिलांवर गर्व करण्याचे पूर्णत: सोडून द्यावे. कारण ते तर जहन्नुम (नरक) चा कोळसा बनले आहेत, नाहीतर ते अल्लाहपाशी त्या शेणकिड्यापेक्षा अधिक तुच्छ बनतील जो घाणीला आपल्या नाकाने ढकलत फिरतो. महान अल्लाहने तुमच्यातून

अज्ञान युगातील अहंकार व वाडवडिलांविषयीचा गर्व दूर केला आहे. माणसे केवळ दोन प्रकारचे आहेत. ईमानधारक व ईशभीरू अथवा कुचरित्र आणि दुर्दैवी लोक, सर्वच्या सर्व आदमची संतती आहेत आणि आदम मातीपासून निर्माण केले गेले होते.'' (हदीस : तिर्मिजी)

माननीय समरा बिन जुंदब (रजि.) निवेदन करतात, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''कुलीनता तर संपत्ती आहे आणि महानता व सज्जनता सदाचाराने प्राप्त होते.''

(हदीस : तिर्मिजी)

वांशिक श्रेष्ठतेचा संबंध घराण्याशी आहे. परंतु जगाच्या दृष्टीत धनसंपत्ती खरी महत्त्वाची आहे. ज्याच्याजवळ संपत्ती आहे त्याची वांशिक श्रेष्ठता उच्चकोटीची असते. सज्जनता व श्रेष्ठत्व एक वेगळीच गोष्ट आहे. ही सदाचार व ईशपरायणतेने उत्पन्न होते.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांना प्रश्न केला गेला - ''मन अक्रमुन्नास?'' लोकांत सर्वात महान कोण आहे? पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले ''अतकाहुम'' जो त्या सर्वात अधिक सदाचारी आहे. निवेदन केले गेले की आम्ही एक दुसरीच गोष्ट विचारू इच्छितो. पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले की तुम्ही वांशिक श्रेष्ठतेविषयी विचारीत आहात. या अर्थाने सर्वात महान आदरणीय यूसुफ (अ.) आहेत. ते स्वत: पैगंबर होते आणि एका पैगंबराचे याकूब (अ.) चिरंजीव होते. तेसुद्धा एका पैगंबरांचे इसहाक (अ.) पुत्र होते आणि ते अल्लाहचे मित्र पैगंबर इब्राहीम (अ.) चे पुत्र होते. यात या गोष्टीकडे निर्देश केला आहे की घराण्याचे वांशिक श्रेष्ठत्वसुद्धा त्याचवेळी श्रेष्ठत्व व महानतेचे कारण बनते जेव्हा त्यात सदाचार आढळतो. महान अल्लाहचे पैगंबर सर्वात जास्त त्याला भिणारे व पुण्य आणि सदाचारात सर्वात अग्रेसर असतात. आदरणीय यूसुफ (अ.) यांना हे श्रेष्ठत्व प्राप्त आहे की तेसुद्धा पैगंबर होते व त्यांच्या पूर्वीच्या तीन महान व्यक्तीसुद्धा अल्लाहचे पैगंबर होत्या. पैगंबरांच्या मित्रांनी निवेदन केले. 'आमचा मुद्दा हादेखील नाही.' पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, तुम्ही जर अरबस्थानातील रूढीविषयी विचारीत असाल तर त्याचे उत्तर असे आहे की जे अज्ञानयुगात अधिक चांगले होते ते इस्लामच्या काळातसुद्धा अधिक चांगले असतील. या अटीवर की त्यांनी इस्लामच्या काळात ज्ञान प्राप्त करावे.'' (हदीस : बुखारी, मुस्लिम)

यातसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अज्ञान काळातील वांशिक प्रतिष्ठेऐवजी धर्माच्या ज्ञानाला अग्रकम दिला आहे. काल जे आपल्या सद्‌गुण आणि योग्यतेच्या दृष्टीने अधिक चांगले होते. आजसुद्धा तेच अधिक चांगले ठरतील. परंतु अट अशी आहे की त्यांनी धर्माचे ज्ञान प्राप्त करावे आणि त्यात ज्ञानाची सखोल दृष्टी निर्माण व्हावी.

आपल्या घराण्याचा गर्वसुद्धा केला जातो आणि दुसऱ्याच्या घराण्याचा व वांशिक प्रतिष्ठेचा उपहास केला जातो. टोमणे दिले जातात आणि तिरस्कारसुद्धा केला जातो. वस्तुत: पहिलीही गोष्ट खरी नाही आणि दुसरीसुद्धा नाही. दोष सर्वांत असतात. कोणीही त्यापासून मुक्त असत नाही. पूर्णत्व केवळ अल्लाहला प्राप्त आहे. माननीय उकबा बिन आमिर (रजि.) चे निवेदन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

''नि:संदेह तुमची ही वांशिक प्रतिष्ठा अशासाठी नव्हे की त्याच्याद्वारे एखाद्याला लज्जित केले जावे. तुम्ही सर्वजण आदमची संतती आहात. (सर्वांत उणिवा आहेत) ज्याप्रकारे साअ (माप) ची कमतरता तुम्ही पूर्ण केल्याशिवाय सोडून द्या. कोणासही कोणावर धर्म व सदाचाराशिवाय कोणत्याही अन्य कारणामुळे कसलेही श्रेष्ठत्व नाही. माणसाच्या विनाशासाठी त्याची व्यर्थ बडबड, कंजूषपणा व फटकळपणा पुरेसा आहे.'' (हदीस: मुसनद अहमद)

## संपत्तीच्या गर्वावर टीका

सधनता व निर्धनतेच्या आधारावरसुद्धा माणसांचे विभाजन झाले आहे. श्रीमंतांनी गरीब व निर्धनांना दाबून ठेवले आणि क्रूरपणे त्यांना लुबाडले. यामुळे हळूहळू जहागिरदार आणि श्रमिकांचे दोन गट अस्तित्वात आले आणि त्यांच्या दरम्यान संघर्ष सुरू झाला. आज हा संघर्ष आपल्या पराकोटीला पोचला आहे. भांडवलदार मजुरांचा अन्यायी लाभ घेऊ इच्छितो आणि मजूर आपल्या हक्कापेक्षा अधिकची मागणी करीत आहे. एवढ्यावरच गोष्ट थांबली नाही, तर माणसाच्या आर्थिक स्थिती त्याची प्रतिष्ठा व अपमानाची प्रमाण बनली. भांडवलदाराने जो केवळ आपल्या भांडवलामुळे चैन करतो, समाजात प्रतिष्ठेच स्थान प्राप्त केले आणि जो बिचारा परिश्रमाने मजुरी करून आजीविका कमवितो त्याला तुच्छ व अपमानित समजले जाऊ लागले. इस्लामने या दोन्ही गोष्टींना उखडून टाकले आहे. त्याने एकीकडे तर दारिद्र्याचा प्रश्न सोडविला, श्रीमंतांच्या संपत्तीत गरिबांचा हक्क ठरवून दिला, संपत्तीच्या संचय व व्यय करण्यावर नैतिक व कायदेशीर निर्बंध लादले, प्रत्येकाला 'रोजी' कमविण्यासाठी उत्तेजित केले, योग्य साधनांची प्राप्ती करण्यात साहाय्य केले आणि जो मनुष्य रोजीसाठी धावपळ करू शकत नाही त्याच्या आर्थिक जबाबदारीचा भार उचलला. दुसरीकडे जाहीरपणे उद्‌घोष केला की मालमत्ता व संपत्ती प्रतिष्ठेची साधने नव्हेत. जगाने जर त्याला प्रतिष्ठेचे मापदंड बनविले आहे, तर ती चूक केली आहे. त्याला हे मापदंड सोडून द्यावे लागेल. भविष्यात अंतिम दिनी महान अल्लाह माणसाच्या संपत्तीला नव्हे, तर त्याचे आचरण पाहील. तेथे यशस्वी तोच होईल ज्याचे आचरण चांगले असेल. व्यभिचारी माणसाला अल्लाहच्या पकडीतून कोणतीही गोष्ट वाचवू शकणार नाही.पवित्र कुरआनमध्ये स्पष्ट शब्दांत सांगितले आहे,

''ही तुमची संपत्ती आणि तुमची संतती नव्हे, जी तुम्हाला आमचे निकटवर्ती स्थान प्रदान करतील. होय, जे ईमान आणतील आणि पुण्यकर्म करतील, तर अशा लोकांसाठी त्यांच्या कर्मांच्या दुप्पट फळ मिळेल आणि ते उच्चस्थानी सुखा समाधानाने राहतील आणि जे लोक आमच्या निशाण्यांना पराभूत करण्यासाठी धावपळ करतात तर ते सर्व प्रकोपात हजर केले जातील.'' (दिव्य कुरआन, ३४:३७-३८)

संपत्तीचे नेतृत्व व सत्तेचेसुद्धा प्रमाण राहिले आहे. ज्या लोकांच्या हातात खजिन्याच्या किल्ल्या होत्या, त्यांनीच सामान्यत: गरीब लोकांवर राज्य केले आणि त्यांच्याशी पशुपेक्षा अधिक वाईट व्यवहार केला. इस्लामने हे प्रमाणदेखील बदलले. पवित्र कुरआनने बनीइस्राईलच्या एका प्रसंगाने हे सत्य समजावून दिले आहे की, मनुष्य संपत्तीमुळे नेतृत्वास पात्र बनत नाही, तर

त्याच्यासाठी उत्तम बौद्धिक व शारीरिक पात्रतेची आवश्यकता असते. बनीइस्राईलने आपल्या एका पैगंबराला विनंती केली की आम्ही आपल्या शत्रूशी (अमालका) सामना करू इच्छितो म्हणून आपण आमच्यासाठी एका सेनापतीची निवड करा. तत्कालीन पैगंबरांनी एक सुपात्र व्यक्ती तालूतची निवड केली. समाजाचे लोक या निवडीने रूष्ट झाले आणि म्हणाले,

"त्याला आमच्यावर सत्ता गाजविण्याचा हक्क कसा प्राप्त होऊ शकतो? याच्यापेक्षा अधिक सत्ता गाजविण्यासाठी आम्ही पात्र आहोत. त्याला आर्थिक संपन्नता आणि सामर्थ्यसुद्धा दिले गेले नाही.

पैगंबरांनी हा अडाणीपणा ऐकून उत्तर दिले,

"अल्लाहने त्याला तुमच्यासाठी निवडले आहे आणि त्याला ज्ञान व शरीरात आधिक्य प्रदान केले आहे. अल्लाह आपला अधिकार ज्याला इच्छितो त्याला देतो. अल्लाह सर्वव्यापी व जाणणारा आहे."
(दिव्य कुरआन, २:२४७)

अर्थ असा की तालूतची आर्थिक स्थिती काही असो व नसो, त्याच्यात असाधारण ज्ञान व प्रचंड कार्यशक्ती आहे. अल्लाहपाशी याच गुणांचे महत्त्व आहे. म्हणून त्यालाच सेनापती बनविले पाहिजे आणि काही कारण नाही की त्याचे सेनापतित्व स्वीकारले जाऊ नये.

हदीसमध्येसुद्धा हे सत्य विविध प्रकारे समजावून दिले गेले आहे की अल्लाहपाशी संपत्तीची किंमत नाही, तर पुण्यकर्म व सदाचाराची आहे.

"माननीय सहल बिन सअद साअदी (रजि.) म्हणतात की - एक पुरुष रस्त्याने गेला. (काहींच्या कथनावरून कळते तो कुरैश होता. आर्थिकदृष्टया सुस्थितीत होता आणि त्याने चांगले वस्त्र परिधान केले होते.) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सहाबा (सोबती) कडे विचारणा केली की "याच्यासंबंधी तुमचे काय मत आहे?" एका व्यक्तीने निवेदन केले की, "हा तर उच्चकुलीनांपैकी आहे. असा योग्य आहे की, एखाद्या ठिकाणी विवाहाची इच्छा व्यक्त केल्यास त्याचा विवाह होईल. जर एखाद्याची शिफारस त्याने केली तर ती शिफारस मान्य केली जाईल." थोड्या अवधीनंतर एक दैन्यावस्थेतील मनुष्य त्या मार्गाने गेला. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लोकांना त्याच्याविषयी विचारले. तेव्हा म्हटले गेले की, "हा मुस्लिम फकिरापैकी एक आहे. तो यास पात्र नाही की एखादे ठिकाणी त्याने लग्नाची मागणी करावी आणि त्याचे लग्न व्हावे अथवा एखाद्याची शिफारस केल्यास ती मान्य केली जावी." पैगंबर (स.) म्हणाले, "ज्याला तुम्ही उच्चकुलीन म्हटले त्याच्यासारख्या लोकांनी जर ही संपूर्ण पृथ्वी भरली तरीसुद्धा त्या सर्वांपेक्षा असला एक फकीर बेहतर आहे."
(हदीस:बुखारी)

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "महान अल्लाह तुमचे मोहरे आणि धनसंपत्ती पाहात नाही, तर तो तुमची मने व तुमची कृत्ये पाहतो."
(हदीस : मुस्लिम)

## सदाचाराचा अर्थ व्यापक आहे

ही गोष्ट पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अन्य प्रसंगीदेखील सांगितली आहे की, धर्मावरील दृढश्रद्धा व सदाचारच श्रेष्ठत्वाचा मूळपाया आहे. महान अल्लाह तेच पाहतो. सदाचाराचा अर्थ फार व्यापक आहे. त्यात अल्लाहचा खरा परिचय, त्याच्या आज्ञांचे पालन, त्याच्या सेवकांचे हक्क देणे, चांगल्या गोष्टी रूजविणे व वाईट गोष्टींचा नायनाट करणेविषयी प्रयत्न करण्याचासुद्धा समावेश आहे.काही हदीस (पैगंबरांचे वचन) मध्ये हे सर्व पैलू उघड करून स्पष्ट केले आहेत. दुर्रत बिन्ते अबी लहब म्हणतात की पैगंबर मुहम्मद (स.) मिंबर (धार्मिक आसन) वर होते की एका व्यक्तीने त्यांना विचारले, की सर्वात चांगला मनुष्य कोण आहे? ते म्हणाले, ''माणसात सर्वात अधिक चांगला तो आहे, जो त्यांच्यापैकी सर्वात जास्त अल्लाहचा ग्रंथ वाचणारा, सर्वात जास्त आदरणीय व अल्लाहला भिणारा, सर्वात जास्त चांगल्या गोष्टींची आज्ञा करणारा आणि वाईट गोष्टींची मनाई करणारा आणि सर्वात जास्त संबंध जोडणारा असेल.'' (हदीस : मुसनद अहमद)

हे आहेत ते उच्चकोटीचे गुण, जे माणसाला सन्मान व प्रतिष्ठेचा अधिकारी बनवितात. पैगंबर मुहम्मद (स.) जवळ त्यांचाच मान व किंमत होती. माननीय आएशा (रजि.) म्हणतात की सदाचाराव्यतिरिक्त जगातील कोणतीच गोष्ट त्यांच्या (पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नजरेला पसंत पडत नव्हती.

''पैगंबर मुहम्मद (स.) कधीही जगाची एखादी वस्तू अथवा एखाद्या माणसाला पाहून आश्चर्य व्यक्त करीत नसत. अपवाद असा की तो मनुष्य सदाचारी असावा.''

(हदीस : मुसनद अहमद)

## अंततः

अशा प्रकारे इस्लाम माणसात हा विश्वास निर्माण करतो की सर्वच्या सर्व माणसे अल्लाहचे सेवक आणि त्याचे गुलाम आहेत. ते एका कुटुंबाचे सदस्य आहेत. त्यांनी मिळून मिसळून अल्लाहची उपासना करण्याचे कर्तव्य पार पाडावयाचे आहे. ते एक आहेत आणि एकाच कामासाठी निर्माण केले गेले आहेत. अल्लाहच्या दृष्टीने कोणीही नीच अथवा उच्चकुलीन नाही. सर्वांची स्थिती एकसमान आहे. माणसांच्या दरम्यान भाषा, रंग, जात व देशाचे जे भेद आढळतात ते अवास्तविक भेद आहेत जे काही लहान लहान कारणांमुळे उद्भवतात. अंतिम दिनी सन्मानित तो असेल जो अल्लाहची आज्ञा पाळणार आहे. ज्यात सदाचार आढळतो आणि ज्याची कृत्ये चांगली आहेत. जो या गुणांपासून वंचित असेल त्याला अल्लाहच्या कोपापासून नात्याचा कोणता हुद्दा व पद वाचवू शकेल आणि ना उच्चकुलीनता. त्याच्यासाठी अपमानच अपमान असेल. हा विश्वास उन्नती व अवनतीच्या सर्व खोट्या भेदांना उखडून टाकतो आणि सर्व माणसे आपला फरक विसरून एका रांगेत उभे राहतात. जगातील विभिन्न आणि आपापसात युद्ध करणाऱ्या जाती व जमातींना केवळ याच आधारावर एकत्र आणले जाऊ शकते. याशिवाय त्याच्या ऐक्याचा अन्य कोणताही मार्ग नाही. काय जग यासाठी तयार आहे? भविष्यच या प्रश्नाचे उत्तर देऊ शकेल.

–०– समाप्त –०–